जलसंपदा विभागांतर्गत शासन स्तरावर प्राप्त होणाऱ्या निविदा स्वीकृतीसाठी समिती गठित करणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र. निविदा २०१७/प्र.क्र.२७४/मोप्र-२**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :-२७/०६/२०१७

वाचा- १) शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.विअसु-२०१५/प्र.क्र.२१८/इमारती-२, दिनांक- १६ डिसेंबर,२०१५

**प्रस्तावना-**

जलसंपदा विभागामार्फत धरण/कालव्याची कामे, कालव्यावरील बांधकामे, कालव्याचे अस्तरीकरण, तसेच परिरक्षण व दुरुस्ती इ. कामे निविदाव्दारे हाती घेऊन पूर्ण करण्यात येतात. सदर कामे कंत्राटदारांना विहित कार्यपध्दतीचे पालन करुन खुल्या स्पर्धात्मक निविदा बोलावून प्राप्त होणा-या निविदांमध्ये निम्नतम/पात्र कंत्राटदारास प्रदान करण्यात येतात व कामे पूर्ण करुन घेण्याबाबत कार्यवाही करण्यात येते. या सर्व प्रक्रियेबाबत शासनाने वेळोवेळी विविध शासन निर्णय /परिपत्रकान्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत.

जलसंपदा विभागाकडे सोपविलेली कामे सुलभ रितीने पार पाडणे शक्य व्हावे याकरिता या विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय अधिका-यांना सार्वजनिक बांधकाम नियमावलीच्या परिशिष्ट-४२अन्वये वित्तीय अधिकार प्रदान केलेले आहेत.

सन १९९६ ते २०१५ या कालावधीत भाववाढ निर्देशांकात मोठया प्रमाणात वाढ झाल्याने महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका १९९४ मधील परिशिष्ट-४२ मधील वित्तीय अधिकारांमध्ये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र. विअसु-२०१५/प्र.क्र.२१८/इमारती-२, दि.१६ डिसेंबर,२०१५ अन्वये सुधारणा करण्यात आल्या आहेत. या शासन निर्णयातील तरतुदीप्रमाणे निविदा स्वीकारण्याचा अधिकार रु.१५ कोटींपर्यंत क्षेत्रिय अधिका-यांना प्रदान करण्यात आले आहेत व रू. १५ कोटी ते ३० कोटींपर्यंत (प्रचलित दरसूचीच्या किंमतीच्या ५ टक्के अधिक्यास अधीन राहून) सार्वजनिक बांधकाम विभाग / जलसंपदा विभाग यांना प्रदान करण्यात आले आहेत. तसेच रु.३० कोटींपेक्षा जास्त किंमतीच्या निविदा स्वीकारण्याचे पूर्ण अधिकार अप्पर मुख्य सचिव (सार्वजनिक बांधकाम विभाग), प्रधान सचिव (जलसंपदा), अप्पर मुख्य सचिव (वित्त) व अप्पर मुख्य सचिव (नियोजन) यांच्या समितीस प्रदान करण्यात आले आहेत.

शासन स्तरावरील निविदा स्वीकृतीच्या संबंधाने येणाऱ्या अडचणी व होणारा विलंब याबाबत अभ्यास करुन शासन आता खालीलप्रमाणे आदेश निर्गमित करीत आहे :-

**आदेश-**

**१) रू. १५ कोटी ते ३० कोटी पर्यंतच्या निविदा स्वीकृतीबाबत-**

सदर निविदा स्विकृतीसाठी खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १. | प्रधान सचिव (जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय | अध्यक्ष |
| २. | सचिव (प्र.स.), जलसंपदा विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ३. | सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ४. | मुख्य अभियंता(दवप्र) तथा सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ५. | आंतरवित्तीय सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ६. | संबंधित उप सचिव | सदस्य सचिव |

- निविदा स्वीकृतीचे प्रस्ताव शासनास प्राप्त झाल्यानंतर संबंधित उप सचिव मंत्रालयात समितीची बैठक आयोजित करतील.
- सदर बैठकीत सर्व सदस्य निविदा स्वीकृती प्रस्तावावर विचार विनिमय करून निर्णय घेतील.
- सदर बैठकीत तपासणी करण्याबाबतची तपासणीसूची सोबत जोडण्यात आली आहे.

२) रू. ३० कोटी पेक्षा जास्त किमतीच्या सर्व निविदा स्वीकृतीबाबत-

- सदर निविदा स्वीकृतीसाठी छाननी करण्याच्या दृष्टीने खालीलप्रमाणे उप समिती स्थापन करण्यात येत आहे:-

| | | |
|---|---|---|
| १. | प्रधान सचिव (जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय | अध्यक्ष |
| २. | सचिव (प्र.स.), जलसंपदा विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ३. | सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ४. | मुख्य अभियंता(दवप्र) तथा सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ५. | आंतरवित्तीय सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ६. | संबंधित उप सचिव | सदस्य सचिव |

- निविदा स्वीकृतीचे प्रस्ताव शासनास प्राप्त झाल्यानंतर संबंधित उप सचिव मंत्रालयात समितीची बैठक आयोजित करतील.
- सदर बैठकीत सर्व सदस्य निविदा स्वीकृती प्रस्तावावर विचार विनिमय करतील.
- सदर बैठकीत झालेल्या चर्चेच्या अनुषंगाने अभिप्रायासह सदर निविदा स्वीकृती प्रस्ताव अप्पर मुख्य सचिव (सार्वजनिक बांधकाम विभाग), प्रधान सचिव (जलसंपदा), अप्पर मुख्य सचिव (वित्त) व अप्पर मुख्य सचिव (नियोजन) यांच्या समितीपुढे निर्णयास्तव ठेवण्यात येईल.
- सदर बैठकीत तपासणी करण्याबाबतची तपासणीसूची सोबत जोडण्यात आली आहे.

**३) रु. ३० कोटी पेक्षा जास्त किमतीच्या निविदा स्वीकृतीचे सर्व प्रस्ताव सविस्तर मुल्यांकन अहवालासह संबंधित महामंडळामार्फत शासनास सादर करावेत. सदर प्रस्ताव मुख्य अभियंत्यानी थेट शासनास सादर करू नयेत.**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२७१६४०४३४७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dharane Mallikarjun Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42153c779eba7d6ca17364b6d37857b105b20a01d36c76 7c7ed1d7d278837bd7, cn=Dharane Mallikarjun Irappa
Date: 2017.06.27 16:39:00 +05'30'

**सहपत्र-** तपासणीसूची

**(म.ई.धरणे)**
**शासनाचे उपसचिव**

**प्रत:**
१) प्रधान सचिव (जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
२) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
३) सचिव (प्र.स.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
४) मुख्य अभियंता(दवप्र) तथा सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
५) आंतर वित्तीय सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) कार्यकारी संचालक, सर्व महामंडळे, जलसंपदा विभाग

७) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
८)जलसंपदा विभागातील सर्व कार्यासने
९) मोप्र २ संग्रहार्थ.

**समितीच्या बैठकीसाठीची तपासणी सूची-**

| अ.क्र. | तपासणी करावयाची बाब | तपशील | शेरा |
|---|---|---|---|
| १. | **प्रशासकीय मान्यता**<br>आदेश क्रमांक :-<br>किंमत :-<br>दरसूची वर्ष :- | | |
| २. | **अर्थसंकल्पिय तपशील**<br>बाब क्र. :-<br>तरतूद :-<br>**ब) प्रापणसूची मंजूरी तपशील (जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र. निविदा-१२१३/ प्र.क्र. (७३५/२०१३)/ मोप्र-१, दिनांक ०७/०९/२०१५ अन्वये विहीत केल्यानूसार**<br>वर्ष:-<br>बाब क्र. :-<br>तरतूद :- | | |
| ३. | **तांत्रिक मंजूरी**<br>आदेश क्रमांक :-<br>किंमत :-<br>दरसूची वर्ष :- | | |
| ४. | **प्रारूप निविदा मंजूरी तपशील**<br>आदेश क्रमांक :-<br>किंमत :- | | |
| ५. | निविदेचा प्रकार | | |
| ६. | **निविदा सूचना प्रसिद्धी**<br>वर्तमानपत्रे व दिनांक :- | | |
| ७. | निविदा सूचना प्रसिद्धीचा कालावधी | | |
| ८. | निविदा सादर करण्याचा अंतिम दिनांक | | |
| ९. | निविदा पूर्व बैठकीचा दिनांक | | |
| १०. | निविदा उघडण्याचा दिनांक | | |
| ११. | एकूण प्राप्त निविदा | | |
| १२. | पात्र कंत्राटदार | | |
| १३. | निम्नतम देकार व कंत्राटदाराचे नाव | | |
| १४. | अंतिम देकार किंमत | | |
| १५. | चालू दरसूचीप्रमाणे निविदेची अद्यावत किंमत | | |
| १६. | निविदा ज्यादा/कमी दराची असल्यास त्याबाबत स्पष्टीकरण | | |
| १७. | अपात्र कंत्राटदारांची नावे व त्याची कारणे | | |
| १८. | अपात्र कंत्राटदारांपैकी न्यायालयात दाद मागितल्यास त्याचा तपशील | | |
| १९. | कमी दराची निविदा असल्यास शासन निर्णय क्र. बीडीजी २०१६/प्र.क्र.२/इमा.२, दि. १२/०२/२०१६ अन्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांच्या अनुषंगाने केलेली कार्यवाही | | |

| | | | |
|---|---|---|---|
| २०. | निविदेचा विधीग्राहय कालावधी | | |
| २१. | पात्र कंत्राटदाराने केलेल्या कामांची यादी व कामाचे स्वरुप | | |
| २२. | कंत्राटदाराच्या क्षमतेबाबत मुख्य अभियंता यांचे अभिप्राय | | |

**मुख्य अभियंता यांची स्वाक्षरी**